यजमान संपादक

**सचिन काकडे (मुंबई )**

अतिथी संपादक

**श्री. मिलींद राजवाडे**

**डॉ. नलिनी साधले**

सहसंपादक

**सोनाली घाटपांडे ( पुणे )**

**अहं ब्रह्मास्मि ( पुणे )**

**सारंग भणगे ( पुणे )**

**स्वप्ना कोल्हे ( नाशिक )**

**सुरुचि नाईक ( नागपूर )**

**रेणूका रेपाळ (अमेरिका)**

**नाम गुम जायेगा ( ठाणे )**

**आनंद माने (सोलापूर)**


२५


**ई-साहित्य प्रकाशन**

अंक क्र. २५ दि. ४ मे २००९









आजचं हे **पंचवीसावं** पाऊल टाकताना सर्व रसिक वाचकांना, अतिथी संपादकांना, आणि आमच्या मागे खंबीरपणे उभ्या असलेल्या सर्व हितचिंतकांना **'नेटाक्षरी'** संपादक मंडळातर्फ़े हार्दिक शुभेच्छा !

थोर शास्त्रज्ञ न्युटनच्या तिस-या नियमाप्रमाणे '**प्रत्येक क्रियेला प्रतिक्रिया ही असतेच** '. यालाच जोडून पुढे आम्हाला असे म्हणावे वाटते '**जितकी जोरदार प्रतिक्रिया असेल तितकाच दुप्पट उत्साह पुढच्या क्रियेत जाणवतो**' नेटाक्षरी चा प्रत्येक अंक मागच्या अंकापेक्षा सरस आणि सर्वोत्कृष्ट असण्यात तुमच्या प्रतिक्रियांचा मोलाचा वाटा आहे. सकाळ पेपर्स चे किसन दाडगे, पुण्याचे कर्नल सायनकर, संगमनेर चे संजय दळवी, लंडन येथील औषध निर्मीती शास्त्रज्ञ प्रमोद वाबले अशा अनेक रसिकांनी त्यांच्या प्रतिक्रियांद्वारे आमचे कौतूक केले, काही सुचना केल्या वेळोवेळी कानउघाडणी सुद्धा केली. अशा हजारो प्रतिक्रिया दर आठवड्याला आमच्या मेलबॉक्स मध्ये येतात, सर्वांची नावे इथे जागेअभावी नमूद करणे अशक्य आहे परंतू या सर्व प्रतिक्रिया नोंदवणा-या रसिकांचे तसेच या अंकाला पुढे फ़ॉरवर्ड करून नेटाक्षरीच्या कार्याला हातभार लावणा-या रसिकांचे आभार मानण्याइतके आम्ही त्यांना परके मानत नाही.

रसिकांच्या प्रतिक्रियांनी भारावून उत्साहाच्या भरात आम्ही हा अंक नामवंत कविंना दाखवायला गेलो. पहिल्यांदा थोडीशी भीतीच होती वाटलं इतरांसारखाच एक अंक म्हणून ते या अंकाकडे पाहतील, पण त्यांनी केलेलं कौतूक पाहून उत्साहाचं भरतं आलं.

**कवीवर्य ग्रेस,कवीवर्य ना.धो. महानोर, तरुणांचे लाडके कवी मंगेश पाडगावकर, प्रसिद्ध सामाजिक आणि हास्यकवि अशोक नायगावकर, कवीवर्य डॉ. जब्बार पटेल, प्रसिद्ध गीतकार कवी प्रविण दवणे अशा अनेक मोठ्या लोकांनी नेटाक्षरी उपक्रमाची स्तुती केली.**

शिवजयंतीचा अंक तर **मा. राज ठाकरे** यांना स्वतः संपादक सचिन काकडे ने नेऊन दिला. कवीवर्य मंगेश पाडगावकर तर अंक पाहून भारावून गेले. त्यांनी तसेच ना धो, जब्बार पटेल यांनी पुढ़ील सर्व अंक पाठवण्याची मागणी केली. चित्रपट क्षेत्रातील तसेच संगीत क्षेत्रातील लोकांशीही संपर्क आला. तसेच या निमीत्ताने अनेक मोठ्या पण फ़ारसे नाव न झालेल्या कवींशीही संपक आला. त्यांनी तर या अंकाचं फ़ारच कौतूक केलं काहीजण अतिथी संपादक होण्यासही तयार झाले. खुपसे आशिर्वाद, सुचना, अनुभवांची देवाणघेवाण यातून नेटाक्षरी समृद्ध होतच आहे.







सन २००८ च्या दिवाळीत रेणूका, स्वप्ना, सोनाली यांच्या संपादनाखाली प्रसिद्ध झालेल्या ई-साहित्य प्रकाशनाच्या पहिल्या दिवाळी अंकाला मिळालेल्या प्रतिसादाने भारावून जाऊन आम्ही सुरु केलेले साप्ताहिक म्हणजे '**नेटाक्षरी** '.

मराठी माणसाचा इंटरनेटवर वाढलेला वावर, वाढत चाललेली कविता वाचनाची आवड, यांचा प्राथमिक विचार करून आमच्या असे लक्षात आले की असा एक हलका-फुलका दर्जेदार अंक हवा जो या इंटरनेटवरील प्रत्येक मराठी माणसापर्यंत पोहचेल, त्याला मराठी साहित्याची जाणीव करून देईल. आमचे स्वतःचे ५०० हून अधिक कवी, ७००० नियमीत वाचक तसेच २५००० हौशी वाचक पाठीशी असल्याने उत्साह दांडगा होता.

प्रत्येक अंकात एक नवा विषय, त्यास न्याय देणा-या विविध दृष्टीकोनातील कविता, अतिथी संपादकाचे या विषयावरील विचार, अशा अनेक गोष्टींनी सजलेला नेटाक्षरी आम्ही दर सोमवारी तुमच्या मेलबॉक्सपर्यंत पोहचवला तोही अगदी विनामूल्य. आज ३५,००० हून अधिक मराठी वाचकांपर्यंत पोहचणारे 'नेटाक्षरी ' हे मराठी साहीत्यक्षेत्रातील एकमेव कवितांचे साप्ताहिक आहे याचा आम्हाला अभिमान आहे. नेटाक्षरी मध्ये प्रसिद्ध झालेल्या सर्व कवितांचे हक्क त्या त्या कवींकडे अबाधीत आहेत.

दर महिन्याच्या पहिल्या पंधरवड्यात घेण्यात येतेय 'नवरसरंग महाकविता स्पर्धा' मागील महिन्यात श्रृंगार रसावरील कविता मागवण्यात आल्या होत्या. स्पर्धेसाठी १५ एप्रिल पर्यंत आलेल्या एकूण ९३ कविता ग्राह्य मानल्या गेल्या, त्या स्पर्धेत निवडण्यात आलेल्या पहिल्या आठ कवितांना या अंकातून आम्ही प्रकाशित करतोय.

या महिन्याचा विषय आणि स्पर्धेची इतर माहीती या अंकात इतरत्र देण्यात आली आहे, सर्व उभरत्या दिग्गज कवींना आग्रहाचे आमंत्रण आहे.

आम्ही आशा करतो नेहमीप्रमाणे हा अंक सुद्धा आपल्या पसंतीस उतरेल.

**-संपादकीय मंडळ**

**अतिथी संपादकांविषयी -**

या अंकाच्या अतिथी संपादक व्यक्ती या आपल्या नवरसरंग कविता स्पर्धेच्या पहिल्या भागाच्या परीक्षक आहेत.

**श्री. मिलींद राजवाडे** हे तत्वज्ञ, विचारवंत, स्फुट लेखक, मराठी साहित्याचे गाढे अभ्यासक, तसेच बहु-आयामी व्यक्तिमत्व म्हणून साहित्य जगतात माहीत आहेत. उमेदीची काही म्हणजे जवळजवळ १० वर्षे परमेश्वराच्या जाणून घेण्यात घालवली आणि त्यात सफ़लता मिळवली. त्यांचा महत्वाचा गूण म्हणजे समाजाच्या कोणत्याही थराशी सहज प्रेरणेने मिलाफ़ करून घेण्याची अजोड वृत्ती.

चित्रकला, हस्तकला, पेंटींग, फ़ोटोग्राफ़ी यांची अत्यंत आवड व हिंदी, इंग्रजी व मराठी साहित्याचा खूप अभ्यास. अनेक कलावंतांना मार्गदर्शन आणि मदत, स्वतः रंगमंचीय कलावंत. एकपात्री वा व्यावसायिक नाटकातून भुमिका ही केल्या आहेत.

**डॉ. नलिनी साधले**, वय ७५ वर्षे परंतू त्या आजच्या आधुनिक युगाशी अगदी समरस होऊन वागतात. स्पर्धेसाठी आलेल्या सर्व कविता त्यांनी ई-मेल द्वारेच वाचल्या आणि त्यांचा निर्णय ही त्यांनी ई-मेल द्वारेच कळवला. डॉ. नलिनी साधले या संस्कृत विषयाच्या गाढ्या अभ्यासक आहेत. १९५५ साली त्यांनी पुण्याच्या स.प. महाविद्यालयातून संस्कृत विषयाची कला शाखेची पदवी घेतली ती ही पहिल्या क्रमांकाने.त्यानंतर १९५७ साली एम.ए. आणि १९८२ साली 'कथासरितसागर' या विषयावर डॉक्टरेट मिळवली.

**अतिथी संपादकांच्या लेखणीतून -**

**श्री. मिलींद राजवाडे**

काव्यांजली व मराठी कविता कम्युनिटीवरील प्रस्तुत श्रृंगार रसप्रधान कवितांच्या स्पर्धेचा परिक्षक होण्याची संधी मिळाली त्याबद्दल प्रथम मी मनःपूर्वक आभार मानतो . ह्या परिक्षणाच्या निमित्ताने हल्लीच्या नवतरूण किंवा व्यापकार्थाने नवकविंच्या भावविश्वात मला डोकावून पहाता आले याचा मला जास्त आनंद होत आहे. माझ्याकडे एकूण ९३ कविता परिक्षणासाठी पोहोचल्या, सर्व कविता आपापल्या परिने उत्तम आहेत . वर उल्लेखल्या प्रमाणे नवोदीत कविंच्या ह्या कविता असल्याने त्या दृष्टीने व ह्यापूर्वी मराठी साहित्य क्षेत्रात होऊन गेलेल्या श्रृंगाररसप्रधान कवितांचा मीटर किंवा दर्जा लक्षात न घेता मला परिक्षण करावेसे वाटले कारण चांगल्याकडून अधिक चांगल्याकडे नेण्याची प्रवृत्ती मला जास्त आवडते.

कवितांचे परिक्षण करताना विचारात घेतलेले मुद्दे :-

१) कवितेचा विषय
२) कवितेचा बाज
३) सौंदर्य
४) विषयाशी प्रामाणिकता
५) सूरूवात आणि शेवटाचा मेळ
६) कथ्य म्हणजे कवितेतून काय सांगायचे आहे ते
७) गेयता

हा खरेतर एक सुंदर प्रवास होता, एका अनोख्या भावविश्वाचा आणि मला खरच अत्यंत आनंद झाला, कौतुक वाटले की अजूनही भावनेने ओथंबलेली माणसे मराठी जगात खूप आहेत.
ह्या एकंदर प्रवासात अनेक प्रकारचे कवी त्यांच्या कवितेतून माझ्याशी बोलले आणि प्रत्येक कविकडे काहितरी विलक्षणता जरूर आहे . काही कविता या श्रुंगाररसाची चांगल्याप्रकारे मांडणी करतात तर काही कविता श्रुंगाररसाशी फारकत घेतलेल्या आढ़ळल्या तर काही शांतरसाच्या जागा चुकलेल्या कविता आढ्ळल्या. श्रुंग़ार हा नवनिर्मितीच्या प्रक्रियेचा सोपान आहे. श्रुंग़ाररसाची फलश्रुती नवनिर्मीतीत झाली नाही तर श्रुंगाराचे काही प्रयोजनच उरत नाही. .श्रुंग़ाररस अनेक प्रकारे मांडता येतो त्यातील श्रुंगाररस जर उत्तेजना निर्माण करण्याजोगा वापरला गेला तर तो जास्त प्रभावी ठरतो आणि ती रचना लौकिकास प्राप्त होते..
उदा मालवून टाक दीप किंवा तरूण आहे रात्र अजूनही वगैरे..

आता कविता हा प्रकार हाताळत असताना कवितेचे जे मुख्य भाग आहेत उदा. शब्द सौंदर्य, शब्दगत शिल्प, भावप्रवाहितता, शब्दाचे नेमके स्थान, कवितेचा काळ त्याकडे दुर्लक्ष झाले की कविता कविता उरत नाही. सर्वात महत्वाची ग़ोष्ट म्हणजे प्रत्येक कडव्याचा बाकीच्या कडव्यांशी साधला गेलेला तोल आणि कवितेचे कथ्य या गोष्टी कवितेला अधिक उंच करतात कवितेचे कथ्य हा अत्यंत महत्वाचा भाग आहे .
मला परिक्षणार्थ मिळालेल्या अनेक कवितातून यमक हा प्रकार मला जास्त आढळला परंतू कवितेचा तोल व अर्थ याकडे दुर्लक्ष झाल्याने हा प्रयास काही ठिकाणी हास्यास्पद झालेला दिसला.

मी आत्तापर्यंत ज्या ९३ कविता परिक्षील्या त्यात शब्दाचे तोकडेपण खूप जाणवले..
खरेतर मराठी भाषा खूप श्रीमंत आहे आणि माझ्या मते सर्व स्पर्धक मराठी भाषिकच असणार तरिही शब्दांचे दारिद्र्य माझ्याने पहावले नाही.. तेव्हा कृपा करून सर्व कविंनी भरपूर वाचन करून आपल्या शब्द संग्रहाची व्याप्ती वाढवावी कारण चांगल्या वाचनातूनच नवनविन शब्द मिळतील.

कवितेविषयी बोलायचे झाल्यास कविता म्हणजे कमी शब्दात जास्त परिणाम साधणारे साधन. गद्य लिहिणे त्यामानाने सोपे असते, पण कविता लिहिणे ये-यागबाळयाचे काम नव्हे आणि आपण सर्व उत्तम कवी बनण्याची कुवत अंगी बाळगून आहात अशी मला खात्री आहे. काही कविता निश्चितच उल्लेखनीय आहेत परंतू त्याही अपावादात्मक आणि श्रृंगार रसाने परिपूर्ण नसलेल्या तरिही त्यांचा उल्लेख मला येथे करावासा वाटतो.

त्या कविता अश्या :
१) घनात तुझीया, २) तुझ लाजण, ३) दिठीत झुलते स्वप्न, ४) संग ५) त्या ओल्या सायंकाळी,
६) उन पावसाचे दिन, ७) गारा वितळतात म्हणून, ८) सौदामिनी ९) तुझ्या खट्याळ चंद्राने
१०) मंद सा-या चांदण्यांना ११) बाहूत गुंतले बाहू १२) सौदामिनी १३) प्रणय रंग होळीचे
१४) गेली राहून करायची कविता १५) ती एक नार १६) स्वप्नातली परी १७) सोहळा

या कविता अजूनही वैशिष्ठ्य पूर्ण झाल्या असत्या परंतू वर म्हटल्या प्रमाणे कवितेच्या मुख्य अंगांकडे दुर्लक्ष झालेले दिसून येते. काही कविता उत्तेजकपणे लिहिलेल्या आढळल्या , जेव्हा साहित्यिक मूल्य विचारात घेउन अशा कवितांकडे पहिले जाते तेव्हा या कविता श्रुंगारिक असूनही सभ्यतेच्या पातळीवर हीन वाटू लागतात. तेव्हा कवीनी याचे भान राखायला हवे.

ब-याच कविता विषय न समजून घेता, ज्याला दर्जात्मकता म्हणतो त्याची कुवत असुनही विचार न करता केलेल्या आढ्ळतात. विषयांची विविधता आढ़ळते परंतू कविता वाचल्यावर निराशा होते, अर्थात हे सर्व कवी त्याच्या परिने चांगलेच लिहित आहेत किंबहुना ते लिहित रहाणॆ हाच उत्तमतेकडॆ नेणारा सोपान आहे.

कविता लिहिण्यापूर्वी कविता म्हणजे काय समजूण घेणे गरजेचे आहे, अनेक पाने लिहून व्यक्त करता येईल असा कोणताही भाव प्रभावी , अचूक व पर्याप्त मांडणीतून थोडक्या शब्दात व्यक्त करणे यालाच कविता म्हणतात. रोज उठुन दिसेल त्यावर कविता केली म्हणजे तो कवी हा चुकीचा समज आहे , एखादी घटना, दृष्य, परिस्थीती ही कविच्या हृदयात घोळली

पाहिजे, चिंतन झाले पाहिजे आणि मग जे काही बाहेर पडेल ते अक्षरशः काही सेकंदात उत्तमपणे मांडून कविता बनते.

तर कविता म्हणजे थोडक्या शब्दात भावना पोचवण्याचे प्रभावी साधन, ती लिहिताना अचूक शब्द, दर्जा , कथ्य , कवितेचा प्रवास, कवितेच्या प्रत्येक ओळीचा मागच्या ऑळीशी संबंध, कवितेची सुरूवात व शेवट यांचा परस्पर अथवा परस्पर विरोधी संबंध यांनी कवितेचा दर्जा अधिक उंचावतो. हल्ली वाचन कमी झाल्याने शब्दसंग्रह तोकडा पडतो, मनात भाव तर असतात पण शब्द्संग्रहाच्या कमतरतेमुळे भाव प्रभावीपणे व्यक्त होत नाहीत परिणामी कविता निरस व बेचव होते.

कविंचे भावविश्व खूप श्रीमंत आहे, त्यांच्याकडून अजून उत्तमोत्तम कविता वाचायला मिळोत अशी मी आशा करतो. काव्यांजली व मराठी कविता कम्युनिटीच्या संयूक्त विद्यमाने कवितांच्या कार्यशाळा आयोजित व्हाव्यात जेणेकरून नवोदीत कविमनाला साहित्यिक शिस्त लागून त्यांच्या कलाकृती अधिक सुंदरतेने प्रकट होतील.

मी स्वतःला एवढा मोठा समजत नाही की मी काही सल्ले द्यावेत पण या कम्युनिटीचे उपक्रम व कविंचा मिळणारा उदंड उत्साह पाहून मला आनंदाचे भरते आले आहे. आपणा सर्व कवींचे मनापासून आभार व आपले भावविश्व उत्तरोत्तर श्रीमंत व वृध्दींगत होवो आणि मला अशाच सुंदर रचना वाचायला मिळोत व ऐकायला मिळोत अशी मी आशा व्यक्त करतो.

आपणा सर्वांना माझ्या खूप खूप शुभेच्छा !!!!

**डॉ. नलिनी साधले -**

कवितेसाठी दिलेला विषय होता श्रृंगार, या रसाचे पावित्र्य, सामर्थ्य आणि सौंदर्य जवळपास सर्वच कवितेतून दिसले नाही. बहुतांश कवींना श्रृंगाराचा केवळ ‘शारिरिक आकर्षण’ इतकाच अर्थ कळला असावा.

चंद्र, तारे, समुद्र, नदी, फ़ुले इत्यादी जुन्याच प्रतिमा, त्यांचे सामर्थ्य जाणल्याविनाच वापरल्या गेल्या आहेत. कवितेच्या अभिव्यक्तीबद्दलच बोलायचे तर शब्दांचा अयोग्य वापर, शुद्ध लिखाणाच्या चूका, व्याकरणदोष, नादमयतेचा अभाव, पाल्हाळीकपणा हे ठळक दोष दिसून येतात.

प्रथितयश कवींच्या कवितेचे वाचन करणे आणि त्यातील कौशल्य आणी वैविध्य आत्मसात करणे फ़ार फ़ार गरजेचे आहे.

**प्रथम क्रमांक विजेती कविता(विभागून )**

## अनंगरंग



धुंद एकांत हा तुझ्या सवेच रंगतो
प्रणयाचा पूर ही हृदयी या उधाणतो ।

स्पर्श स्पर्श जागवी अनोखीच चेतना
श्वास श्वास धुंद हा तनूवरी विसावतो ।

उष्ण अधर कापती रंगती कपोलही
मुक्त कुंतलात या जीव तुझा गुंततो ।

झंकारे देहवीणा तुझीया कवेत रे
रासझुला चांदवा अनंगरंग उसळतो ।

विखुरले उशीवरी चांदणे अजूनही
नाहूनी प्रितीत मनमोगराही उमलतो ।

बरसत्या चांदण्यात तारकांच्या मैफिली
रातराणी बहरे धुंडा चाफा दरवळतो ।

**- मनिषा भिडे**

प्रथम क्रमांक विजेती कविता(विभागून )

## पहिली रात्र

जवळ ये सखी अशी
हातात हात गुंफू दे
नाजूक स्पर्शफुले उमलत
ही रात्र अशीच सरू दे

डोळ्यात तुझ्या त्या गहि-या
खोल खोल मज हरवू दे
चिरस्मृती मनात साठवित
ही रात्र अशीच सरू दे

एकांतातल्या सहवासात या
मुक्या क्षणांना बहरू दे
लज्जेची लाली तुझ्या गालांवर पसरत
ही रात्र अशीच सरू दे

चुरगळलेला गजरा तुझा
मिलनगोष्ट आपुली सांगू दे
सुगंध -सलाम रातराणीचा घेत
ही रात्र अशीच सरू दे



- **भूषण किनगावकर (क्लोरोफॉर्म)**

### द्वितीय क्रमांक विजेती कविता

## रिक्त

तप्त होते तृप्त झाले
बध्द होते मुक्त झाले
शांतशा एकांतडोही
व्यक्त आणिक रिक्त झाले

मादकशी देहवीणा
मन्मनी झंकारली
धून ती श्रृंगारलेली
तू सख्या की छेडीली




अस्पर्श होते कामीनी
प्रकटली ती दामिनी
विस्कटूनी  त्या क्षणी मी
साज ल्याले यौवनी

गात्र बोले नेत्र ओले
तृप्त रसना रिक्त प्याले
देही देही गुंफूनी मी
व्यक्त आणिक रिक्त झाले

- **ऋचा घाणेकर**

तृतीय क्रमांक विजेती कविता

## इश्श्य

पहाटे उठून आरशात पाहशील अन लाजशील
तुला वाटेल मी पाहिले की काय ?

भाळावरिल बिंदी सरकत मानेखाली आलेली असेल
तुला वाटेल हे मी केले की काय ?

हळूच साडीचा पदर दारात गूंतेल
तुला वाटेल मी ओढले की काय ?

करकचलेली काचोळीची काज मोकळी करशील
तुला वाटेल मी सोडली की काय ?



ओल्या केसांतून एक बट पाठीवर रूळेल
तुला वाटेल माझे बोट फ़िरले की काय ?
मानेवर एखादा चावट थेंब निथळेल
तुला वाटेल माझे ओठ फ़िरले की काय ?

अंगाभोवती तलम वस्त्र गुंडाळशील
तुला वाटेल मी मिठीत घेतले की काय ?

अलगद त्याची शेसरगाठ सुटेल
तुला वाटेल...इश्श्य... वेड लागले की काय ?

**- दीपक साळूंके**
**( सईमय )**

# मंद सा-या चांदण्यांना



मंद सा-या चांदण्यांना,
थांब ऎसे सांग ना तू
अजूनही ते सुख आहे
लांब ऎसे सांग ना तू

रोम रोमातून स्पर्श
अजुनही फ़िरलाच नाही
श्वास माझा अन उसासा
अजुनही विरलाच नाही
अजुनही ऒठी गुलाबी
रंग, ऎसे सांग ना तू
अजुनही ते सुख आहे.....

जवळ घे शोषून घे
फ़ुल सारे चुरगळू दे
ओठी घे प्राशून घे
गोडसा तू मध गळू दे
अजुनही ऊठतो फ़ुलाचा
गंध, ऎसे सांग ना तू
अजुनही ते सुख आहे...

या मिठीतुन अंतराचे
गणित सारे चुक ठरवू
या मिठीतून अंतराची
आग सारी आज विझवू
या मिठीतच आज मी रे
दंग, ऎसे सांग ना तू
अजुनही ते सुख आहे
लांब, ऎसे सांग ना तू

**- अम्बरीश देशपांडे**

## तुझं लाजणं

तुझं लाजणं
आणि खळी पाडत हसणं,
जणू गुलाबाच्या पाकळीवर...
फुलपाखराने बसणं !

काळजात भरले, तुझे काजळ भरलेले डोळे
हनुवटीवरचा तीळ...
जीवाला करतो खुळे,
कसं काय जमतं तुला...
इतकं गोड दिसणं ?
जणू गुलाबाच्या पाकळीवर...
फुलपाखराने बसणं !




पेरलेला मोगरा, अन...
सावरलेल्या बटा,
सारवलेल्या अंगणात जशा
रांगोळी रंग छटा,
पापण्यांच्या पल्याड...
तू दडवलेली स्वप्न !
जणू गुलाबाच्या पाकळीवर...
फुलपाखराने बसणं !
ओठ तुझे कळया...
की मकरंदाचा ठेवा,
मूर्तिमंत सुगंध तू...
श्वास तरी कसा घ्यावा?
ग़ाल फुगवत...नाक उडवत...
तुझं खोटं खोटं रूसणं !
जणू गुलाबाच्या पाकळीवर...
फुलपाखराने बसणं !

**- मंदार चोळकर**

# वृंदावन

तुझ्या माझ्या घराचं अंगण पाहिलं ,
की मन आजही थरारतं...
जसं पहिल्या अवचित सरींनी
पान अन पान शहारतं...

माझ्याकडचा निशिगंध वेडा,
आजही तसाच बहरतो..
तू यावीस खुडण्यास म्हणुन
गंध तुझ्या घरभर फ़िरवतो..



तू लावलेला मोगरा,
आजही जोमाने फुलतो..
हलकासा सुगंध त्याचा मग
माझ्या मनात सलतो..

अंगणातली रातराणी तुझी
आजही निस्तब्ध आहे..
माझ्या घरचा प्राजक्त मात्र
तिच्यावरच लुब्ध आहे..

आपण मिळून लावलेलं
रोप आजही लाजतं..
माझ्यावरून वाहिल्या वाऱ्यानेही
लगेच पान मिटतं

माहेरी आलीस की एकदा
बाजूच्या वृंदावनात येऊन जा
अजूनही तहानलेल्या तुळशीला
पाणी थोडं देऊन जा

**- विनायक उजळांबे**

# गारा वितळतात म्हणून



गारा वितळतात म्हणून त्या
वेचायाचे कोणी सोडीत नाही
तुझ्या एका नकाराने
नाते काही मी तोडीत नाही
काहीही म्हण तू
पण शब्दांनी प्रेम असे तुटत नाही
नाही भेटलो पुन्हा तरी
न भेटल्याने हृदयातील प्रेम आटत नाही
कळतंय मला तुला आज
माझ्याबद्दल काही वाटत नाही
पण लक्षांत ठेव
दाबल्याने प्रेम कधी दबत नाही
तू फ़क्त हसत रहा
दुसरं काहिही मी मागत नाही

**- गीत**

काव्यांजली आणि मराठी कविता तुमच्यासाठी घेऊन येत आहेत

======================================

नवरस काव्यस्पर्धा मालिका

======================================

यात आहेत साहित्यातील नऊ रस प्रत्येक स्पर्धा एका रसावरील कवितांची
नऊ रस नऊ स्पर्धा एक महामालिकाच म्हणा ना !!!
दर महिन्याला एक रस तब्बल नऊ महिने चालणारे ही धम्माल !!!

काव्यस्पर्धेचा उद्देश 'चढाओढ'हा नाही, कोणी छोट - मोठं, कविता चांगली वाईट सिध्द करण हा ही नाही.
ही स्पर्धा आपल्या प्रतिभेला आव्हान आहे, सृजनशक्तीला आवाहन आहे.
निवड्क कविता नेटाक्षरीमध्ये प्रसिध्द होतील. हजारोंपर्यंत जातील. बक्षिसेही असतीलच.

लिहा मंडळी ! बघुया महाराष्ट्राच्या उद्याच्या 'लेखण्या' काय आहेत ते.

======================================

या महिन्याचा 'रस'विषय रसराज 'हास्य'

======================================

तुमच्या १/२ 'हास्य' कविता आम्हाला १५ मे २००९ पर्यंत
marathikavitamarathispardha@gmail.com
वर पाठवा. सोबत आपल्या ओरकूट प्रोफाईलची व ब्लॉगची लिंक नक्की पाठवा.
अधिक माहिती कम्युनिटीवर मिळेल.

रसिकांना नेहमी उत्तमोत्तम आणि नवनवीन काव्य पुरविण्याचा ई-साहित्य प्रकाशनाचा ध्यास 'नेटाक्षरी' जोमाने पार पाडत आहे. दर आठवड्यात मिळणा-या तुमच्या प्रतिसादांनी आमचा उत्साह द्विगुणीत होतोय, नेटाक्षरी हा साप्ताहिक अंक सध्या सुमारे ३५००० मराठी रसिकांना विनामूल्य वितरीत केला जातो. त्याव्यतिरिक्त वेबसाईट्वर व्हिजिट करून वाचणाऱ्यांची संख्या लक्षणीय आहे. हा अंक आपण आपल्या ईष्टमित्रांना फ़ॉरवर्ड करण्यास आमची काही हरकत नाही परंतू असे करताना आमच्या आयडीचा अंतर्भाव केल्यास आम्ही आभारी राहू . मराठी कवितेची लोकप्रियता वाढवण्यास आपला हातभार लागावा ही इच्छा. आपल्यासारख्या रसिकांच्या सहाय्याने हा अंक लवकरच एक लक्ष वाचकांपर्यंत नियमित पोहोचवण्याचा आमचा संकल्प सिद्धीस जाईल असा आम्हाला विश्वास आहे.

netaksharee@gmail.com